फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी मान्यता दिल्यानुसार वाढीव बी.फार्मसी अभ्यासक्रमाच्या प्रवेश क्षमतेस शासन मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. टीईएम-२०२०/प्र.क्र.११२/तांशि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०७ सप्टेंबर, २०२०

**वाचा :-** संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. २/एनजीसी/ मान्यता/२०२०/४८३, दि.७ जुलै, २०२०.

**प्रस्तावना :**

फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांचे मान्यतेस अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०१९-२०२० करीता बॉम्बे कॉलेज ऑफ फार्मसी, मुंबई येथील वाढीव बी.फार्मसी अभ्यासक्रमाच्या प्रवेश क्षमतेस विनाअनुदानित तत्वावर सुरू करण्यास शासन मान्यता देणेबाबत संचालकांनी संदर्भाधीन पत्राव्दारे प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यास शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांचे मान्यतेस अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०१९-२०२० करीता बॉम्बे कॉलेज ऑफ फार्मसी, मुंबई येथील वाढीव बी.फार्मसी अभ्यासक्रमाच्या प्रवेश क्षमतेस विनाअनुदानित तत्वावर सुरू करण्यास खालील तक्त्यामध्ये नमूद केल्याप्रमाणे वाढीव प्रवेश क्षमतेस खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव व डिटीई संकेतांक | अभ्यासक्रम | शैक्षणिक वर्ष २०१९-२० मधील प्रवेश क्षमता | शैक्षणिक वर्ष २०२०-२१ करीता प्रवेश क्षमता |
|---|---|---|---|---|
| १ | ३०१६, बॉम्बे कॉलेज ऑफ फार्मसी, कलिना, सांताक्रुज (पुर्व), मुंबई ४०० ०९० | बी.फार्मसी | ६० (अनुदानित) | ६० - अनुदानित<br>४० -विनाअनुदानित |

**अटी व शर्ती:-**

१) सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.
२) प्रस्तुत बाबतीत फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेशक्षमता वरीलप्रमाणे राहील.
३) शासनाने विहित केलेल्या तसेच फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४) सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र राज्य विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६) सदर पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

७) शिक्षण शुल्क समितीने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८) संस्थेने हा कायम विनाअनुदानित अभ्यासक्रम चालविण्यास स्वतंत्र पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके  फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१०) रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

२. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र. २०२००९०७१३५३१४१००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=fcf7172a73579b34fa622983d8fb647780fbef1d35a1ca975955eb9193f3f800, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2020.09.08 11:55:32 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२) सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, मुंबई (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)

३) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.

४) संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)

५) अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.

६) फार्मसी कौन्सिल ऑफ इंडिया, कम्बाईन्ड कौऊन्सिल बिल्डींग, कोटला रोड, ऐवान-ए-गालिब मार्ग, नवी दिल्ली-११०००२

७) विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई.

८) निवड नस्ती / तांशि-४.